श्री.राधेश्याम एल. मोपलवार, भाप्रसे यांच्याविरूध्द प्राप्त तक्रारींबाबत चौकशी करण्यासाठी चौकशी समितीची स्थापना.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्रमांकः भाप्रसे-१११७/प्र.क्र.१०८ /१०-अ,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२,

तारीख: २९.०८.२०१७

**प्रस्तावना:-**

सन २०१७ च्या पावसाळी अधिवेशनात विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांत श्री. राधेश्याम एल. मोपलवार, भाप्रसे यांच्या विरूध्द विविध आरोप करण्यात आले होते. या विषयावर झालेल्या चर्चेवर निवेदन करतांना मा. मुख्यमंत्री यांनी श्री. राधेश्याम एल. मोपलवार, भाप्रसे यांच्याविरूध्दच्या त्या आरोपांसंदर्भात चौकशी करण्यात येईल असे आश्वासन दिले आहे. मा. मुख्यमंत्री यांनी दिलेले सदर आश्वासन विचारात घेऊन या प्रकरणाची चौकशी करण्यासाठी एका समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

या शासन निर्णयान्वये श्री. राधेश्याम एल. मोपलवार, भाप्रसे यांच्याविरूध्दच्या विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहात प्रस्तुत चर्चेत आलेल्या आरोपांच्या अनुषंगाने चौकशी करण्यासाठी खालीलप्रमाणे चौकशी समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) श्री. जॉनी जोसेफ, सेवानिवृत्त भाप्रसे | - | अध्यक्ष |
| २) श्री. प्रविण पडवळ, अतिरिक्त पोलीस आयुक्त, मुंबई | - | सदस्य |
| ३) पोलीस उप आयुक्त (आर्थिक गुन्हे अन्वेषण), मुंबई (पोलीस आयुक्त, मुंबई यांनी नामनिर्देशीत केलेले) | - | सदस्य |

२. सदर चौकशी समितीची मुदत १ महिन्याची राहील.

३. सदर चौकशीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल.

१) विधीमंडळात सन २०१७ च्या पावसाळी अधिवेशनातील श्री.राध्येशाम एल. मोपलवार, भाप्रसे यांच्यावरील विविध आरोपाबाबतीतील चर्चेच्यावेळी नमूद, श्री. मोपलवार, मुख्य कार्यकारी अधिकारी, एम.एस.आर.डी.सी. यांच्या संभाषणाच्या ऑडियो क्लिप, सी.डी. आणि निवेदन यांची सत्यता व त्या अनुषंगाने पुढील कार्यवाही सुचविणे.

२) श्री. मोपलवार यांनी एम.एस.आर.डी.सी. येथे काम करीत असतांना, समृध्दी महामार्ग व तत्सम इतर कामे हाताळलेली आहेत. या कामाचे वरील नमूद आरोपाशी काही संबंध आहेत काय याची पडताळणी करणे.

३) श्री.मोपलवार, हे सी.बी.आय. यांच्याकडे आरोपी आहेत व ते जामिनावर असे आरोप वर नमूद चर्चेदरम्यान करण्यात आले आहेत, ह्या बाबीची वस्तुस्थितीदर्शक पडताळणी करणे.

४) चौकशी दरम्यान उपरोक्त नमूद मुद्दयांव्यतिरिक्त शासनास द्यावयाचे असल्यास अन्य मुद्दे.

४. श्री. राधेश्याम मोपलवार, भाप्रसे यांच्यावरील विविध आरोपांसंदर्भातील अनुषंगिक कागदपत्रे/दस्तऐवज संबंधित संसदीय कार्य विभाग, सामान्य प्रशासन विभाग, गृह विभाग आणि अन्य संबंधित विभागातील संबंधित कार्यासनांकडून चौकशी समितीस उपलब्ध करून देण्यात येतील.

५. चौकशी समितीच्या कामकाजासाठी आवश्यक कार्यालयीन व्यवस्थेसंदर्भातील तसेच चौकशी समितीचे अध्यक्ष यांचे मानधन व इतर सवलतीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२९१५३८०१९६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mukesh Khullar

Digitally signed by Mukesh Khullar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6481e097db98eaae8b0580130544ebced12d1340cea24fcd0132235fb0c544a8, cn=Mukesh Khullar
Date: 2017.08.31 11:07:01 +05'30'

**(मुकेश खुल्लर)**
**अपर मुख्य सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३) मा. विरोधी पक्षनेते (विधानसभा), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. विरोधी पक्षनेते (विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई,
६) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७) श्री.जॉनी जोसेफ, सेवानिवृत्त भाप्रसे
८) श्री. प्रविण पडवळ, अतिरिक्त पोलीस आयुक्त, मुंबई
९) पोलीस उप आयुक्त (आर्थिक गुन्हे अन्वेषण), मुंबई,
१०) निवड नस्ती (का. ९ आणि १०-अ).